**३६ महाराष्ट्र बटालियन, राष्ट्रीय छात्र सेना, पुणे या कार्यालयास प्रशिक्षण शिबिराकरीता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**
**शासन निर्णय क्र :-राछासे-२०२४/प्र.क्र.५३/क्रीयुसे-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन,मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०७ मे, २०२४.

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि. १७.०४.२०१५
२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र.राछासे/अर्थप्रशिबिरे/२०२४-२५/का-५/८९, दि. १५.०४.२०२४
३. कर्नल, राष्ट्रीय छात्र सेना, पुणे यांचे पत्र क्र.३२१(b)/Acct/Camp/GVM/२०२४, दि. २४.०४.२०२४

**प्रस्तावना :-**

शिक्षण संस्थेतील माध्यमिक, उच्च माध्यमिक व महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी सन १९४८-४९ मध्ये राष्ट्रीय छात्रसेना दलाची देशव्यापी स्वरुपात स्थापना करण्यात आली असून राष्ट्रीय छात्रसेनेची तरतूद व रचना करण्याच्या दृष्टीने "राष्ट्रीय छात्रसेना कायदा, १९४८" हा अधिनियम करण्यात आला आहे. ३६ महाराष्ट्र बटालियन, राष्ट्रीय छात्र सेना, पुणे यांच्या ( IGSC- Selection Trails Cum Coaching Camp-२०२४) प्रशिक्षण शिबीराच्या आयोजनाकरीता रू. २१,८३,६२८/- इतका निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** : -

३६ महाराष्ट्र बटालियन, राष्ट्रीय छात्र सेना, पुणे यांच्या ( IGSC- Selection Trails Cum Coaching Camp-२०२४) प्रशिक्षण शिबीराच्या आयोजनाकरीता खालील तक्त्यात नमूद बाबींकरीता रू. २१,८३,६२८/- ( अक्षरी रूपये एकवीस लक्ष त्र्याऐंशी हजार सहाशे अठ्ठावीस फक्त. ) इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | प्रशिक्षण/शिबिर कार्यालयाचे नांव | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|
| १. | Professional Coaching Charges | रू. ८,१०,०००/- |
| २. | ५० मीटर Shooting रेंज Charges | रू. १,२१,५००/- |
| ३. | Inescapable Items including Shooting Kit | रू. २,९५,८७२/- |
| ४. | POL Charges | रू. ५७,२४०/- |
| ५. | Hiring of Civil Driver | रू. २६,६१६/- |
| ६. | Extra Diet | रू. १,२९,६००/- |
| ७. | Mufti Clothing | रू. २,३२,८००/- |
| ८. | Miscellaneous Expenditure | रू. ८५,०००/- |
| ९. | Foreign Ammunition | रू. ४,२५,०००/- |
| | एकूण | रू. २१,८३,६२८/- |

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३ /विनियम,भाग-२, दि. १७.०४.२०१५ मध्ये निर्देशित केल्यानुसार वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-३, अनु. क्र. ४ परि. क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर खर्च मागणी क्रमांक- ई-३, २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०२, (०१) विद्यार्थ्यांसाठी युवक कल्याण कार्यक्रम (०१)(०१) राष्ट्रीय छात्र सेना (अनिवार्य) २१, पुरवठा व सामग्री (२२०४ ००१६) या लेखाशीर्षामध्ये सन २०२४-२५ मध्ये उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा या लेखाशिर्षांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर करण्यांत आलेल्या तरतुदीपेक्षा जास्त निधी खर्च होणार नाही या अटीच्या अधीन राहून सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे. सदर रक्कम कोषागारातून आहरित करणेकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून समादेशक अ़धिकारी, ३६ महाराष्ट्र बटालियन, राष्ट्रीय छात्र सेना, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०५०७१५५३४८७५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL SURYAKANT HANJE

Digitally signed by SUNIL SURYAKANT HANJE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=b52de42797ba0b88d4615daa9566ad8fa49d50637950208576d69ab9dba313a9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=345A2816550FE595955B31526C8E1A31863F6F9DC898D91E4543436BE8B73FDA, cn=SUNIL SURYAKANT HANJE
Date: 2024.05.07 16:06:50 +05'30'

**( सुनिल हंजे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव ( क्रीडा ), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. अतिरिक्त महासंचालक, राष्ट्रीय छात्र सेना संचालनालय, मुंबई
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा ) महाराष्ट्र-१ मुंबई
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई (संचालनालयामार्फत)
६. विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे विभाग, पुणे
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९. समादेशक अधिकारी, ३६ महाराष्ट्र बटालियन, राष्ट्रीय छात्र सेना, पुणे
१०.अवर सचिव (व्यय-५/अर्थसंकल्प-८) वित्त विभाग- मंत्रालय, मुंबई
११.अवर सचिव ( अर्थसंकल्प ), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.निवड नस्ती, क्रीयुसे-३